राज्यात नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्यासाठी विचारात घ्यावयाची मार्गदर्शक तत्त्वे व त्या अनुषंगाने करावयाची कार्यवाहीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३६२२/प्र.क्र.१०४(२)/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २५ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, Government of Bombay, Home Department Resolution No. PRS-५३५९/५७-V Sachivalaya, Bombay-३२ Dated २३rd January, १९६०.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एमआयएस-०२११/प्र.क्र.२३/पोल-३, दिनांक ०४ मे २०११.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्रमांक : पोमसं/धोरण/४४/ नविन पो. ठाणे मनुष्यबळ निकष/०२/२०२२/२११, दिनांक २०/०७/२०२२.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्रमांक : पोमसं/धोरण/४४/ नविन पो. ठाणे मनुष्यबळ निकष/०२/२०२२/२९६, दिनांक २४/११/२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्यात नवीन पोलीस ठाणे निर्मितीचे प्रस्ताव संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेऊन, पोलीस महासंचालक कार्यालयामार्फत शासनास सादर केले जातात.

२. राज्यातील वाढती लोकसंख्या, वाढते औद्योगिकीकरण व शहरीकरण त्यामुळे जीवनमान पद्धतीत झालेला बदल, त्यानुसार गुन्ह्यांचे बदलेले स्वरुप, सोशल मिडीयाचा समाजात मोठ्या प्रमाणात झालेला प्रसार व वाढता वापर व त्या माध्यमातून होणारे धार्मिक/राजकीय गुन्हे, त्यांचे समजात उमटणारे पडसाद, इंटरनेटच्या माध्यमातून होणारे आर्थिक फसवणूकीचे गुन्हे यामध्ये आमुलाग्र बदल झालेला असल्याने, त्यानुसार नवीन पोलीस ठाणे निर्मितीची मार्गदर्शक तत्त्वे सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

**नवीन पोलीस ठाणे निर्मितीसाठी खालील मार्गदर्शक तत्वांचा विचार करावा.**

(१) नवीन तालुके निर्मिती झालेल्या ठिकाणी वेगळे पोलीस ठाणे असावे.

(२) शहरीकरण,औद्योगिकरण-मोठ्या प्रमाणात नवीन शहरे बसवणे (S.E.Z.) मोठया प्रमाणातील निवासी कॉम्प्लेक्स यांच्या पासून २ कि.मी. परिघात पोलीस ठाणे असावे.

(३) ग्रामीण भागातील दोन पोलीस ठाण्यामधील अंतर सर्वसाधारपणे १० कि.मी. पेक्षा जास्त नसावे, शहरी भागात ४ कि.मी. पेक्षा जास्त नसावे.

(४) लोकसंख्येची घनता,विशेष भौगोलिक स्थान,पर्यटन स्थळे अशा ठिकाणी स्वतंत्र पोलीस ठाणे असावे.

(५) शरीरा विरुध्दचे व संपत्ती विषयी पारंपारिक गुन्हे ज्या ठिकाणी मोठया प्रमाणात होतात.

(६) आर्थिक गुन्हे (बँका, आर्थिक संस्था, **व्यापारी** ठिकाणे) जिथे वारंवार **आर्थिक गुन्हे,चोऱ्या व दरोडे** पडतात अशी ठिकाणे.

(७) ज्या ठिकाणी वाहनांची संख्या मोठया प्रमाणात आहे व त्यामुळे मोठ्या प्रमाणात वाहतूकीची कोंडी होते, वारंवार अपघात होतात, अशा ठिकाणी वाहतूक पोलीस चौकी असावी.

(८) सुरक्षेच्या दृष्टीने महत्वाची ठिकाणे, जसे शैक्षणिक संस्था, हॉस्टेल, धार्मिक स्थळे, न्यायालये, बस स्थानके, अणु उर्जा प्रकल्प, विदयुत प्रकल्प, मोठी धरणे, खेळाची मोठी स्टेडीयम्स अशा ठिकाणी स्वतंत्र पोलीस ठाणे असावे.

(९) सामाजिक स्तरावरील गुन्हे,जसे अनुसूचित जाती/अनु.जमाती/मतिमंद/शारीरिक अपंग व महिला यांच्यावर वारंवार ज्या ठिकाणी अत्याचार होतात अशा ठिकाणी.

(१०) करेक्शनल ऑफेन्सेस उदा.**अंमली पदार्थाचे सेवन व विक्री,लहान मुलांबाबत होणारे गुन्हे** वारंवार ज्या ठिकाणी होतात अशी ठिकाणे.

(११) डायल ११२ वर ज्या ठिकाणावरून जास्त प्रमाणात मासिक कॉल प्राप्त होतात अशा ठिकाणी.

(१२) मोठी देवस्थाने, प्रार्थना गृहे ज्या ठिकाणी धार्मिक कार्यक्रम उदा. मोठया प्रमाणात यात्रा, मेळावे, वारंवार होतात व जमाव नियंत्रणाचे काम करावे लागते अशा ठिकाणी पोलीस ठाणे असावे.

(१३) सायबर गुन्हे जिथे वारंवार घडतात अशी ठिकाणे.

(१४) मानवी तस्करी होणारी ठिकाणे.

(१५) शरीर विक्रीचा व्यवसाय करणारी ठिकाणे.

२. **प्रस्तावित नवीन पोलीस ठाणेच्या हद्दीतील मागील ३ वर्षातील गुन्हयांची संख्या खालीलप्रमाणे असणे अपेक्षित आहे.**

अ) **भाग १ ते ५** भा.दं.वि.मधील गुन्हयांची आकडेवारीची सरासरी १५० पेक्षा जास्त असणे अपेक्षित आहे, **व**

ब) **भाग-६** भा.दं.वि. आणि स्थानिक कायद्यातंर्गत गुन्हे असे मिळून गुन्हयांची संख्या २०० पेक्षा जास्त असणे अपेक्षित आहे.

३. तसेच,राज्यात नवीन पोलीस ठाणे निर्मितीसाठी उपरोक्त निकषामधील जास्तीत जास्त निकषांची पूर्तता होणे आवश्यक राहणार आहे.

त्यासबंधित प्रस्ताव सादर करताना, ज्या निकषांची पूर्तता होत आहे, अशा निकषांबाबतची समर्पक आकडेवारी व समर्थन/स्पष्टीकरणासह प्रस्ताव सादर करणे आवश्यक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२५१७४९४९३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.08.25 17:51:17 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) सर्व पोलीस आयुक्त/सर्व पोलीस अधीक्षक,महाराष्ट्र.
९) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र.
१०) सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१३) सह सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
१४) वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१५) निवड नस्ती, पोल-३.